कोव्हिड -१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोव्हिड-१९ मुळे मृत्यू होणा-या अंगणवाडी कर्मचारी यांना सानुग्रह सहाय मंजूर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२२/प्र.क्र.१४/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ मे,२०२२

**संदर्भ:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण/प्र.क्र.४/का-९, दिनांक २९.५.२०२०.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण/प्र.क्र.४/का-९, दिनांक १४.१०.२०२०.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण/प्र.क्र.४/का-९, दिनांक १४.०५.२०२१.
४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का७/अंगणवाडी/ १४६३/२०२२, दिनांक ४.०४.२०२२.
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४.४.२०२२

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोव्हिड -१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिडमुळे मृत्यू होणाऱ्या कर्मचा-यांना विमा कवच/ सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार कोविड विषयक कर्तव्यावरील ( सर्वेक्षण, शोध, माग काढणे, प्रतिबंध, चाचणी, उपचार, मदत कार्य इ. ) कर्मचाऱ्यांना मृत्युच्या सर्व प्रकरणी रु. ५० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय मंजूर करण्याची कार्यपध्दती सदर शासन निर्णयामध्ये नमूद करण्यांत आली आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदीस अनुसरुन आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रांन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन कोविड-१९ संबंधीत कर्तव्य बजावताना कोविडमुळे मृत्यू झालेल्या खालील अंगणवाडी कर्मचाऱ्यांच्या प्रकरणी प्रत्येकी रु. ५० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | अंगणवाडी कर्मचाऱ्यांचे नांव | पदनाम | मृत्यूचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | बीड | श्रीमती चंपाबाई बापूसाहेब येळे | अंगणवाडी सेविका | २२.९.२०२० |
| २ | अहमदनगर | श्रीमती निर्मला दुर्गादास घाडगे | अंगणवाडी सेविका | १७.१२.२०२० |

३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र. ४/व्यय-९ दि. २९.५.२०२० मधील तरतूदीनुसार वरीलप्रमाणे मृत्यू झालेल्या अंगणवाडी कर्मचा-ऱ्यांच्या वारसास या संदर्भातील तरतुदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

४. सदर प्रयोजनासाठी येणारा रु. १.०० कोटी खर्च भागविण्याकरिता खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद विद्यमान तरतुदीमधून

रकाना क्रमांक-३ मध्ये दर्शविल्यानुसार एकुण रुपये १.०० कोटी एवढा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| लेखाशिर्षे व बाब | विद्यमान तरतूद २०२२-२३ | या आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २२३६-पोषण आहार<br>०२-पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>१०१-विशेष पोषण आहार कार्यक्रम<br>(०८)(०५) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च)<br>अतिरिक्त राज्य हिस्सा १००%<br>(२२३६ १९४५)<br>१३- कार्यालयीन खर्च | १०.७५ | १.०० |

५. हा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक- १३८/व्यय ६, दिनांक १७.०५.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५१९१६३९०३५३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2022.05.27 14:44:36 +05'30'

**(महेश वरुडकर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३) संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद),
४) संबधित जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) (जिल्हा परिषद)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
७) संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
८) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
९) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती -का-६.